**सन १९९३ मधील भूकंपामध्ये बाधित झालेल्या लातूर व उस्मानाबाद जिल्हयातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरीता शासनाने संपादीत केलेल्या जमीनीच्या भूधारकांना वाढीव मोबदल्याचा निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन (म.व पु.)विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-०१/२०१९/प्र.क.०८/म-११**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
**दिनांक- २९ जानेवारी, २०१९.**

**वाचा:-** १) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२ दिनांक ०३.०६.२०१५.
२) शासन निर्णय क्रमांक महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) आव्यप्र-२०१६/प्र.क.३६/आव्यप्र-०२ दिनांक २७/०४/२०१६
३) शासन निर्णय क्रमांक महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) आव्यप्र २०१८/प्र.क.६६/आव्यप्र-०२ दिनांक १७/०१/२०१९.

**प्रस्तावना :-**

सन १९९३ मध्ये लातूर व उस्मानाबाद जिल्हयांमध्ये झालेल्या भूकंपामध्ये बाधित झालेल्या भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरीता शासनाने संपादीत केलेल्या जमीनीच्या भूधारकांना मा. दिवाणी न्यायालयाने विविध भूसंदर्भामध्ये वाढील मोबदला दिला असल्याने या विविध प्रकरणास शासनाने मा. उच्च न्यायालयात अपील्स दाखल केली आहेत. सदर प्रकरणावर मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार संबंधित भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम १८ व कलम २८-अ खाली सुधारीत परिगणनेनुसार वाढीव मोबदला देण्यासंदर्भात उपरोक्त संदर्भ क्रमांक ०३ दिनांक १७ जानेवारी, २०१९ रोजीचा शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली. त्यानुसार विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन १९९३ मध्ये लातूर व उस्मानाबाद जिल्हयांमध्ये झालेल्या भूकंपामध्ये बाधित झालेल्या भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरीता शासनाने संपादीत केलेल्या जमीन भूधारकांनी भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम १८ व कलम २८-अ अन्वये मा. उच्च न्यायालयाचे निर्णयानुसार वाढीव मोबदला देण्यासाठी संदर्भ क्रमांक ०३ मध्ये नमूद केलेल्या पाच प्रस्तावांना एकूण **रुपये ७३,९६,२८५/- (अक्षरी त्र्याहत्तर लाख शहयाण्णव हजार दोनशे पंच्याऐंशी फक्त )** इतका निधी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना वितरीत करण्याकरीता या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षामध्ये, मागणी क्र. सी-६, मुख्य लेखाशीर्ष क्र.२२४५- नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य, ०६- भूकंप, १०१- अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांव्यतिरिक्त खर्च (९२) (०१) भूकंपग्रस्तांसाठी सहाय्य ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ २४८१) या लेखाशिर्षाखाली पुनर्विनियोजनाद्वारे **रुपये ७३,९६,२८५/- (अक्षरी त्र्यहात्तर लाख शहयाण्णव हजार दोनशे पंच्याऐंशी फक्त )** इतका निधी **विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (Beams) द्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

३. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची विभागीय आयुक्त, औरंगाबाद तसेच जिल्हाधिकारी, लातूर आणि उस्मानाबाद यांनी खातरजमा करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्त यांनी एकत्रित महसूल व वन विभागास न चुकता सादर करावे. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाची पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार /उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या देयकासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/ उपशिर्षाच्या “संगणक यंत्र” संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/ उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

५. शासन निर्णय संदर्भ क्रमांक ०३ मध्ये नमूद अटी, व शर्तीच्या पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी व त्यातील मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२१२३४२१६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

RAJASHREE MILIND RAUT

Digitally signed by RAJASHREE MILIND RAUT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=58e3cf7b9657c2ed6d6d47f01918bccb8dcaac1f1b6f31c7c723db4deb16f5f2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=6689500497ea8c2084eb7b303b8b2f3922ec7b73b6347d04e043dc0b8ef0fd64, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJASHREE MILIND RAUT
Date: 2019.02.02 12:44:39 +05'30'

**( राजश्री राऊत )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रति,**

१. मा.मंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
२. मा. मंत्री (भूकंप व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,
३. मा.राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
४. अपर मुख्य सचिव (म. व पु.) यांचे स्वीय सहाय्यक,
५. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
६. जिल्हाधिकारी, लातूर/उस्मानाबाद
७. संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
८. संबंधित कोषागार अधिकारी,

९. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती),

१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ०२३,

११. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१,

१२. निवासी लेखाधिकारी, मुंबई,

१३. वित्त विभाग(अर्थसंकल्प-६/व्यय-९/अर्थोपाय कक्ष, वित्त आयोग कक्ष),मंत्रालय,मुंबई-३२,

१४. कार्यासन अधिकारी (ब-१/आव्यप्र.२/पीएसी कार्यासने), मंत्रालय, मुंबई-३२,

१५. निवडनस्ती ( कार्यासन म-११)